# आफ्रिकी गुलामांचा व्यापार



लेखिका: शर्ली न्यूमन



# आफ्रिकी गुलामांचा व्यापार

मराठी अनुवादः सुशील मेन्सन

# अनुक्रम







*ओलाउदा इक्विआनो*चे चित्र
इ.स. 1780

प्रकरण एक

# आफ्रिकेतील गुलामगिरी

"एके दिवशी घरातले सगळे लोक कामाला निघून गेले होते. मी आणि माझी छोटी बहीण घराची देखभाल करत होतो. तेव्हा दोन पुरूष आणि एक स्त्री भिंत चढून घरात आले. त्यांनी आम्हा दोघा भावंडांना पकडले," *ओलाउदा इक्विआनो*ने ही घटना आपल्या आत्मचरित्रात लिहिलेली आहे.

1760 साली त्यांचे गांबिया देशातून अपहरण झाले, तेव्हा ओलाउदा अकरा वर्षांचा होता. अपहरणकर्त्यांनी त्या भावाबहिणींना अलग केले. त्यांच्यापैकी एका पुरुषाने ओलाउदाला एका पोत्यात कोंबले आणि पोते धान्याच्या पोत्यागत आपल्या खांद्यावर घेतले.



गुलामांचे अरब व्यापारी पळवून आणलेल्या काळ्या
लोकांना गुलाम म्हणून विकण्यासाठी घेऊन जात आहेत.

ओलाउदाला एकदाच नाही, तर अनेकदा गुलाम म्हणून विकण्यात आले. पहिल्यावेळी तो स्वत:ची कशीबशी सुटका करून घरी परतला. पण पुन्हा त्याचे अपहरण करण्यात आले. यावेळी अपहरणकर्त्यांनी त्याला एका इंग्लिश जहाजाच्या कप्तानाला विकले.

ओलाउदा इक्विआनोच्या अपहरणाच्या खूप पूर्वीपासून युरोपीय लोक आफ्रिकी पुरूष, स्त्रिया आणि मुलांचे अपहरण करून त्यांची विक्री करत असत. 1400 साली, युरोपीय लोक येण्याच्या शेकडो वर्षे आधी, आफ्रिकी लोक गुलामांचा व्यापार करत असत. ई.स. पूर्व 300 साली, उत्तर आफ्रिकेतील अरब लोक काळ्या आफ्रिकी लोकांना मध्यपूर्व देशांमधील बाजारात नेऊन विकत असत.

मध्यपूर्वेत पोहोचेपर्यंत बरेच गुलाम भयानक उष्मा, थकवा आणि तहानेने मृत्युमुखी पडत. यातून बचावलेल्या गुलामांना भूमध्यसागरापार युरोपात नेऊन विकले जात असे. अरब व्यापारी पश्चिम किनाऱ्यावरील तसेच पूर्व आफ्रिकेतील लोकांचीही विक्री करत असत. अरब व्यापाऱ्यांबरोबरच काही आफ्रिकी टोळ्यादेखील गुलाम मिळवण्यासाठी लगतच्या गावांवर छापे टाकत असत.

आश्चर्याची गोष्ट आहे, आफ्रिकी लोक आपल्याच लोकांचा व्यापार कशासाठी करत? आफ्रिका हा एक विशाल खंड आहे. तिथे शेकडो विविध समूह आणि जमाती आहेत. लोक आपल्याच जमातीच्या लोकांशी संबंध ठेवत असत. फ्रेंच आणि डच लोक कसे वेगवेगळ्या देशांतील आहेत, तशीच भावना आफ्रिकेतील दोन जमातींमध्ये होती. *यारुबा* जमातीतील लोकांनी *हौसा* जमातीतील लोकांचा पराभव केला, तेव्हा त्यांनी हौसा लोकांना गुलाम म्हणून ठेवले.

## आफ्रिकेत एका गुलामाचे जीवन

आफ्रिकेत विकले गेलेले बरेचसे गुलाम युद्धकैदी असत. ओलाउदा इक्विआनोसारख्या काही लोकांचे अपहरण करून त्यांची गुलामांच्या व्यापाऱ्यांना विक्री केली जात असे. काही लोकांना त्यांनी केलेल्या गुन्ह्याची शिक्षा म्हणून गुलाम बनवत असत. जेव्हा घरी अन्नपाणी नसे, तेव्हा काही आईबाप आपल्या मुलांना विकत असत. यामुळे मुलांना किमान खायला तरी मिळेल, अशी त्यांची अपेक्षा असे. काही लोक कर्ज चुकवण्यासाठी गुलामगिरी पत्करत असत. काही भागात तर लोकांचे अपहरण करून विकणाऱ्या लोकांनाही गुलाम बनवले जात असे. कुणा गुलाम आईचे मूल आपोआप तिच्या मालकाचा गुलाम होत असे.

पण आफ्रिकेतील गुलामांना इतर देशांतील गुलामांसारखी निर्दयी वागणूक मिळत नसे. मालक गुलामांना आपल्या कुटुंबाचेच सदस्य मानत असत.

**राजा ते गुलाम**

एवढेच नव्हे, तर आफ्रिकी राजघराण्याचे प्रमुख किंवा इतर सदस्यदेखील गुलाम बनू शकत असत. *इब्राहामा* हा फुल्बे जमातीचा राजपुत्र होता. त्याने जेन्ने आणि टिंबक्टू या शहरांमध्ये राहून भूगोल, खगोलशास्त्र, गणित, धर्म आणि कायदा यांचा अभ्यास केला. वयाच्या सतराव्या वर्षी इब्राहामा सैन्यात दाखल झाला आणि मग युद्धकैदी बनला. त्याला एका इंग्लिश जहाजाच्या कप्तानाला विकण्यात आले आणि मग अमेरिकेला नेऊन मिसिसीपीमध्ये गुलाम म्हणून विकण्यात आले.
अशाचप्रकारे, नायजेरियाच्या राजाचा मुलगा *उकासो* यालाही गुलाम बनवण्यात आले. एका अरब व्यापाऱ्याने त्याला *पाण्यावर चालणारे पंख असलेले घर* बघायला सोबत नेले. ते *पंख असलेले घर* म्हणजे गुलामांनी भरलेले एक डच जहाज होते. अरब व्यापाऱ्याने राजपुत्राला जहाजाच्या डच कप्तानाला विकले.

“बरेच दिवस प्रवास केल्यावर मला एका सरदाराकडे सुपूर्द केले,” ओलाउदा इक्विआनो लिहितो. “सरदाराला दोन पत्नी होत्या आणि त्यांनी मला चांगली वागणूक दिली.” *गोल्ड कोस्ट* (सध्याचे *घाना*) येथील *अशांती* या जमातीत गुलाम लग्न करू शकत असे, संपत्ती ठेवू शकत असे आणि त्याला मालकाच्या संपत्तीचा काही भागही मिळू शकत असे. काही गुलामांकडे त्यांचे स्वत:चे गुलाम असत आणि काही गुलाम आपल्या मालकाचे निधन झाल्यावर स्वत: मालक बनत.
काही गुलाम सैनिक बनत आणि काही अधिकारी पदापर्यंत पोहोचत. काही गुलाम खाणीतून सोने आणि मीठ काढत किंवा झाडातून रबराचा चीक काढत किंवा हस्तीदंत गोळा करत. काही गुलाम मोठ्या शेतांवर काम करत.

## गुलामांच्या आफ्रिकी व्यापाऱ्यांचा गावांवर छापा

आफ्रिकी व्यापारी नेहमी घोड्यांवर स्वार होऊन आफ्रिकी गावांना वेढा घालत. ते तेथील घरे जाळून टाकत आणि पळून जाणाऱ्या लोकांचा पाठलाग करत.

हल्लेखोर बंदीवानांना एकत्र लाकडी फळ्यांमध्ये किंवा साखळ्यांमध्ये जखडून घोड्यांच्या शेपटीला बांधून टाकत. शेतांमध्ये शेतकऱ्यांवर हल्ला करताना कुणी उलट हल्ला करण्याची शक्यता असे. अशा परिस्थितीत, तेथून लवकर निसटता यावे यासाठी घाई करावी लागे. हल्लेखोर लोक गुलामांना बराकीत किंवा मातीतील खड्ड्यात साखळ्यांनी जखडून ठेवत. युरोपीय लोक आफ्रिकेत येण्यापूर्वी हल्लेखोर या गुलामांना इतर आफ्रिकी जमातींना विकून टाकत.



गुलामांचे आफ्रिकी व्यापारी गुलाम मिळवण्यासाठी गावावर हल्ला करतात.



युरोपीय लोकांचे आगमन झाल्यानंतर गुलामांची मागणी वाढली. युरोपीय लोक आफ्रिकी व्यापाऱ्यांना गुलामांच्या बदल्यात मालाची विक्री करत. काहीवेळा युरोपीय लोक स्वत: किंवा आफ्रिकी टोळ्यांना भाड्याने घेऊन गावांवर हल्ले करत आणि तेथील लोकांना गुलाम बनवत.

युरोपीय लोकांनी समुद्र किनारी चाळीस किल्ले बांधले होते. पकडून आणलेल्या किंवा खरेदी केलेल्या गुलामांना ते कैद करून तिथे ठेवत. पोर्तुगीज लोकांनी अटलांटिक महासागराच्या किनाऱ्यावर एका उंच पर्वतावर *एल्मिना* किल्ला बांधला. हा किल्ला आता घाना या देशात आहे. या किल्ल्यात एका वेळी एक हजार गुलाम ठेवता येत होते. किल्ल्यात उंच मनोरे होते आणि किल्ल्यांच्या भिंती 50 फूट (10 मीटर) जाड होत्या.



एकमार्गी दरवाजा

सध्याच्या सेनेगल देशापासून 2 मैलांवर (3 किलोमीटरवर) असलेल्या *गोरी* बेटावर व्यापाऱ्यांची घरे असत. जहाजावर चढवण्याआधी व्यापारी लोक गुलामांना आपल्या घराच्या अंधाऱ्या तळघरात ठेवत. आज पर्यटक गुलामांना जहाजावर घेऊन जाणाऱ्या तेथील दरवाजात उभे राहू शकतात. ते कल्पना करू शकतात की एका अनोळखी देशात गुलाम म्हणून जाताना या आफ्रिकी लोकांना कसे वाटत असेल.

या किल्ल्यांभोवती पाण्याने भरलेले खंदक असत. किल्ल्याचे रक्षण करण्यासाठी चारशे तोफा होत्या. मध्य आफ्रिकेतील गुलामांना साखळ्यांनी जखडून शेकडो मैल चालवत नेत किंवा नदीतून नेत. जहाज येईपर्यंत त्यांना दीर्घ काळ कैदेत ठेवत. काळ सरत गेला तसे, युरोपीय किल्ले वेगवेगळ्या लोकांच्या ताब्यात गेले. कारण वेगवेगळ्या देशांतील व्यापाऱ्यांमध्ये गुलामांसाठी स्पर्धा निर्माण झाली. अखेरीस, इंग्लंड, फ्रान्स आणि हॉलंड हे देश गुलामांच्या व्यापारात सर्वाधिक सक्रिय झाले.

### गुलामांच्या व्यापाराविरोधात राज्यकर्ते

काही आफ्रिकी राज्यकर्ते गुलामांच्या व्यापारात गुंतले असले तरी अनेक राज्यकर्त्यांनी त्याविरुद्ध संघर्ष केला. त्यावेळी राणी *एनझिंगा* सध्याच्या अंगोला देशावर राज्य करत होती. तिने पलायन केलेल्या गुलामांचे रक्षण केले. 1600 साली तिने गुलामांच्या पोर्तुगीज व्यापाऱ्यांवर छोटी आक्रमणे केली.

युरोपीय देशांप्रमाणेच कित्येक आफ्रिकी समूहदेखील गुलामांच्या व्यापारात पैसा कमावण्यास उत्सुक होते. कालांतराने, अनेक आफ्रिकी राजांनी युरोपीय व्यापाऱ्यांना गुलामांची विक्री केली. 1726 साली *डाहोमी* (आता *बेनिन*) देशाचा राजा *अगाजाने* इंग्लंडचा राजा जॉर्ज एक याला चाळीस गुलाम व एक पत्र पाठवले. राजा अगाजा *गुणवत्तापूर्ण माल* विकत घेण्यास उत्सुक होता, असे त्याने पत्रात लिहिले. त्याने पत्रात हेदेखील लिहिले "....अशा गुणवत्तापूर्ण मालाच्या बदल्यात तो हजार गुलाम देऊ शकतो."

*गुणवत्तापूर्ण माल* याचा अर्थ होता, बंदुका, बंदुकीची दारू, कापड, लोखंडी सळया, तंबाखू, मद्य, सोने आणि कवड्या (यांचा वापर काही लोक पैसा म्हणून करत).
एक डच व्यापारी त्याच्या डायरीत लिहितो, "बंदुका आणि त्याची दारू हा तेथील सर्वाधिक लोकप्रिय माल होता. त्याचा पुरवठा केला नाही तर आम्हाला गुलाम मिळत नसत."



युरोपीय व्यापारी आफ्रिकेत लोकांच्या बदल्यात माल विकत आहेत.



*वाइल्डफायर* नावाच्या जहाजाच्या डेकवर बसलेले गुलाम

## प्रकरण दोन

# प्रवास

गुलामांना आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावरील व्यापारी बंदरापासून एक दीर्घ, खडतर प्रवास करावा लागे. सुरुवातीला, युरोपीय लोक गुलामांना युरोपात घेऊन जात आणि तिथे विकत. नंतर, विविध युरोपीय देशांनी अमेरिकेत वसाहती स्थापन केल्यावर, गुलामांना अटलांटिक महासागरामार्गे तेथे नेले जाऊ लागले. तिथे त्यांना गूळ, साखर आणि मद्याच्या बदल्यात विकले जात असे. मग या वस्तू युरोपात विकून पुन्हा इतर वस्तुंची आणि गुलामांची खरेदी केली जात असे. पश्चिम आफ्रिका ते अमेरिका या प्रवासाला *मध्य मार्ग* म्हटले जात असे आणि यासाठी सुमारे पंचेचाळीस दिवस लागत.

**गुलामांचे व्यापारी ते पाद्री आणि गीतकार**

*जॉन न्यूटन* हे एक इंग्रज कप्तान होते. त्यांनी गुलामांचा व्यापार करणे सोडून दिले आणि ते पाद्री बनले. त्यांनी *अमेझिंग ग्रेस* नावाचे भजन लिहिले. त्यात “ज्याने माझ्यासारख्या अभाग्याला वाचवले,” अशी ओळ आहे. “कुणालातरी गुलाम करणं, ही गोष्ट मन बधिर करते आणि गुलामांच्या व्यापारात गुंतलेले लोक इतरांच्या दु:खाबाबत उदासीन होतात,” असे त्यांनी लिहून ठेवले आहे.





प्रवासाआधी एक व्यापारी एका निरोगी गुलामाला तप्त लोखंडाने शिक्का मारत आहे.

नंतर, काही जहाजे आफ्रिकेचा पश्चिम किनारा सोडून केप ऑफ गुड होपला वळसा घालून पूर्व किनाऱ्यावर गेली आणि तिथे लोकांचे अपहरण करून त्यांचा व्यापार करण्यास सुरुवात केली. आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्यापासून अमेरिकेत जाण्यास दोन-तीन महिने लागत.

जहाजाचे कर्मचारी गुलामांना माल किंवा जनावरच समजत. “जहाजावर आणल्यावर कर्मचाऱ्यांनी मला हवेत वर उडवले, मी निरोगी आहे की नाही हे तपासण्यासाठी,” ओलाउदा इक्विनआनोने लिहिले आहे. यापूर्वी त्याने कधी गोऱ्या लोकांना पाहिले नव्हते. कुणीतरी त्याला सांगितले होते की गोरे लोक काळ्या लोकांना खातात. त्यामुळे आगीवर ठेवलेल्या भांड्यात उकळणारे पाणी पाहून तो भीतीने बेशुद्ध पडला. त्याला वाटले की गोरे लोक त्याला त्यात शिजवणार आहेत. “आफ्रिकेतील गुलामांना जहाजावरील गुलामांइतके निर्दयीपणे वागवले जात नसे,” ओलाउदा म्हणतो. तो आपल्याच देशात गुलाम व्हायला आनंदाने तयार झाला असता.

अमेरिकेत जाण्याआधी गुलामांची तपासणी केली जात असे. त्यांच्या स्नायुंना आणि सांध्यांना चिमटे काढले जात, त्यांच्या दातांवर, डोळ्यांवर आणि छातीवर ठोसे दिले जात. निरोगी गुलामांवर त्यांच्या मालकाचा किंवा कंपनीचा शिक्का मारला जात असे. गुलामांच्या छातीवर, खांद्यावर किंवा गालावर लाल तप्त लोखंडाने हा शिक्का मारला जात असे.



जहाजावर गुलाम नेहमी भुकेले असत. गर्दीमुळे त्यांना अंग मुडपून बसावे लागत असे.

## प्रवासात आजार

फ्रेंच जहाज *रोडर*चा चालक आणि बरेचसे कर्मचारी एकदा नेत्ररोगाने आजारी पडले. त्यांच्या डोळ्यांना सूज आली. त्यामुळे त्यांना तात्पुरते किंवा कायम अंधत्व आले. एका वादळात बचावल्यावर, रोडर मार्ग चुकले. त्यांनी एका स्पॅनिश जहाजाकडे मदत मागितली. पण मदत मिळाली नाही. त्या स्पॅनिश जहाजावरचे सर्व लोक अंध झाले होते. शेवटी, रोडरच्या चालकाची दृष्टी परतली आणि जहाज वेस्ट इंडिजमधील *ग्वाडेलुप* या फ्रेंच बेटावर पोहोचले. कप्तानाने एकोणचाळीस अंध गुलामांना समुद्रात फेकून दिले. स्पॅनिश जहाज कुठल्याच बंदरावर पोहोचले नाही. त्याचे पुढे काय झाले, याची नोंद नाही.

कधीकधी दिवसा स्त्रिया आणि मुलांना जहाजाच्या डेकवर जाऊ दिले जात असे. रात्री सर्व गुलामांना मालाच्या गोदामात डेकच्या खाली ठेवत असत. पण तिथे इतकी गर्दी असे की कूस बदलणेही कठीण जात असे. गुलामांनी समुद्रात उड्या मारू नयेत म्हणून त्यांचे पाय आणि मनगट साखळ्यांमध्ये जखडत. आफ्रिकेचा किनारा नजरेआड होईपर्यंत त्यांना याच स्थितीत राहावे लागत असे.

बरेच कप्तान जहाजांमध्ये जास्तीतजास्त गुलाम भरून जास्त पैसा कमावण्याचा विचार करत. प्रवासात काही गुलाम मेले तरी त्यांना पर्वा नसे. गर्दीमुळे गुलामांना खडबडीत, लाकडी फळ्यांवर झोपावे लागत असे. कधी कधी अपुऱ्या जागेमुळे त्यांना एकावर एक फळ्यांवर बसलेल्या अवस्थेत झोप काढावी लागत असे.



### जहाजावरील भोजन आणि पाणी

1600 साली जहाजांवर धान्य व पाण्याचे मिश्रण शिजवून घट्ट करून गुलामांना खायला देत. 1700 साली गुलामांना खायला फळे, बिस्किटे, वाटाणे आणि खाऱ्या मांसाचा छोटा तुकडा मिळू लागले. जेव्हा गुलाम आत्महत्या करण्यासाठी भोजनाचा त्याग करत तेव्हा त्यांचे तोंड धातुच्या साधनांनी बळजबरीने उघडून जेवण आत कोंबत.
प्रवासाच्या शेवटी, विक्रिच्या हेतूने गुलाम जाडजुड व्हावेत म्हणून त्यांना जास्त भोजन देत. किनाऱ्यावर पोहोचल्यावर, काही गुलामांना शेतावर घेऊन जात आणि खायला घालून गुबगुबीत बनवत.
गुलामांना मिळणाऱ्या पाण्याला मर्यादा होती. काही वेळा त्यांना दिवसाला फक्त एक कप पाणी देत. बऱ्याच जहाजांवर, पाणी अस्वच्छ पिंपांमध्ये साठवून ठेवत. त्यामुळे आजार पसरत, मृत्यू होत.

अमेरिकेला पोहोचेपर्यंत हजारो गुलाम मरत किंवा स्वत:ला मारून टाकत. एकदा एक पोर्तुगीज जहाज 1200 गुलाम घेऊन आफ्रिकेहून निघाले आणि दक्षिण अमेरिकेतील ब्राझील देशात फक्त 600 गुलाम घेऊन पोहोचले. शार्क माशांचे थवे नेहमी अशा जहाजांचा पाठलाग करत. गुलांमांचे शव कधी फेकतात किंवा गुलाम पाण्यात कधी उडी मारतात, याची ते वाट बघत.

शौचालय म्हणून वापरल्या जाणाऱ्या मोठ्या टबात मुले बऱ्याचदा पडत असत. डेकच्या खाली गोदामांमध्ये हवा एवढी गरम आणि दुर्गंधीत असे की काही गुलाम गुदमरुन मरत. काही जहाजांवर दर सकाळी दोन-तीन गुलाम मरून पडलेले दिसत.
समुद्र शांत असला की काही वेळा गुलामांना थोडा वेळ डेकवर घेऊन जात. त्यांना चाबकाचे फटके लगावून गाण्यास व नाचण्यास भाग पाडले जात असे. यामुळे गुलामांना व्यायाम मिळत असे आणि कर्मचाऱ्यांचे मनोरंजन होत असे. वादळी हवामान असताना, गुलामांना गोदामांमध्ये ठेवत. जहाजाच्या हेलकाव्यांमुळे काही गुलामांना उलट्या होत. त्यामुळे गोदामांत दुर्गंधी वाढत असे.

## गुलामांचे बंड

बरीचशी बंडे आफ्रिकेचा किनारा सोडण्याआधी किंवा सोडल्यावर लगेच होत. सहसा बंडे अयशस्वी होत कारण गुलाम नि:शस्त्र असत आणि कर्मचाऱ्यांकडे बंदुका व तलवारी असत. कर्मचारी बंडखोरांना वेगवेगळ्या प्रकारच्या शिक्षा करत. कधी त्यांना चाबकाचे फटके मारत, कधी गळा दाबत, कधी फाशी देत, कधी गोळी मारत, कधी अवयव कापत तर कधी पाण्यात बुडवून टाकत.

### टॉम्बा, एक शूर नेता

काही इंग्लिश व्यापाऱ्यांनी सध्याच्या *गिनी* देशातील एक आफ्रिकी नेता *टॉम्बा* याला गुलाम बनवले. कारण त्याने इतर आफ्रिकी नेत्यांना गुलामगिरी प्रथेस विरोध करण्यास सांगितले. टॉम्बा जहाजाच्या गोदामात होता, तेव्हा एक स्त्री गुलाम त्याच्याकडे एक हातोडा घेऊन आली. टॉम्बा, आणखी एक गुलाम आणि ती स्त्री गुलाम गुपचुप डेकवर आले. तिथे काही नाविक झोपले होते. टॉम्बाने एका नाविकाच्या डोक्यावर हातोड्याने प्रहार केला. त्याचवेळी कप्तान *हार्डिंग* आणि इतर कर्मचारी डेकवर आले.
टॉम्बा आणि इतर गुलामांना जड लोखंडी बेड्या ठोकण्यात आल्या, चाबकाने फोडून काढण्यात आले. पण ते बळकट असल्यामुळे त्यांना चांगली किंमत मिळेल, या हेतूने त्यांना जिवंत ठेवण्यात आले. स्त्री गुलामाला तिच्या अंगठ्याद्वारे लटकवून व मग सुरा खपसून तिची हत्या करण्यात आली.



स्पॅनिश जहाज *ॲमिस्टॅड*वरील गुलामांचे बंड
.

1532 साली पोर्तुगीज जहाज *मिस्रिकॉर्डिआ*वर शंभर गुलामांच्या साखळ्या सैल होऊन तुटल्या. मोकळ्या झालेल्या गुलामांनी तीन वगळता सर्व कर्मचाऱ्यांना ठार केले. वाचलेले तीन कर्मचारी एका नावेतून पळून गेले. पण गुलामांचे पुढे काय झाले, याची माहिती कुणालाही नाही.

तीस वर्षांनंतर, एक स्पॅनिश जहाज दक्षिण अमेरिकेच्या किनाऱ्यावर उध्वस्त झाले. तेव्हा बंदिवान गुलामांनी यात बचावलेल्या नाविकांना ठार मारले. *इलेकस* नावाचा एक गुलाम दक्षिण अमेरिकेतच राहीला आणि तेथील स्थानिक इंडियन लोकांचा नेता बनला.

1700 च्या दशकात, एका इंग्लिश कप्तानाने आफ्रिकेतील एक नदीत आपल्या जहाजाचा नांगर टाकला. त्याने अनेक आफ्रिकी लोकांना व्यापारासाठी जहाजावर येण्यास सांगितले. पण ते जहाजावर आल्यावर जहाजाने त्यांना घेऊन पलायन केले. जहाज समुद्रावर पोहोचले तेव्हा वादळ आल्याने ते पुन्हा माघारी फिरले. यामुळे त्यांना नदीत पूर्वीच्याच जागेवर नांगर टाकावा लागला. मग जवळच किनाऱ्यावर राहाणारे काही आफ्रिकी लोक जहाजावर चढले. त्यांनी बऱ्याचशा कर्मचाऱ्यांना ठार मारले आणि आपल्या आफ्रिकी बांधवांची सुटका केली.

1730 च्या दशकात, इंग्लिश जहाज *लिटल जॉर्ज*वरील शहाण्णव आफ्रिकी लोकांनी जहाज ताब्यात घे ऊन काही कर्मचाऱ्यांना समुद्रात फेकून दिले. इतर कर्मचारी आणि चालक बंदुका घेऊन एका खोलीत लपून बसले. त्यांना आशा होती की आफ्रिकी लोक शरण येतील कारण त्यांना जहाज चालवता येत नव्हते. पण त्यांचा अंदाज चुकला. आफ्रिकी लोकांनी जहाज पुन्हा आफ्रिकेला नेले आणि ते पळून गेले.

## प्रवास संपल्यावर

गुलामांची जहाजे अमेरिकेत आल्यावर बचावलेल्या गुलामांना खुल्या बाजारात विकले जात असे. आपल्या पसंतीचा गुलाम निवडण्यासाठी खरेदीदारांची अक्षरश: झुंबड उडत असे. ओलाउदा इक्विआनो वेस्ट इंडिजच्या बार्बाडोसमध्ये उतरल्यावर त्यालाही विकण्यात आले. “नातेवाईक आणि मित्र एकमेकांपासून अलग झाले,” तो लिहितो. त्यांच्यापैकी अनेकांनी पुन्हा कधी एकमेकांची तोंडे पाहिली नाहीत.



TO BE SOLD by William Yeomans, (in Charles Town Merchant,) a parcel of good Plantation Slaves. Encouragement will be given by taking Rice in Payment, or any Time Credit, Security to be given if required. There's likewiſe to be ſold, very good Trooping ſaddles and Furniture, choice Barbados and Boſton Rum, alſo Cordial Waters and Limejuice, as well as a parcel of extraordinary Indian trading Goods, and many of other ſorts ſuitable for the Seaſon.

गुलामांचे व्यापारी स्थानिक वृत्तपत्रांत आपल्या गुलामांच्या विक्रिची जाहिरात देत असत. सोबतच्या चित्रात, 1744 साली *चार्ल्स टाऊन* मध्ये प्रकाशित झालेली जाहिरात.

ज्या गुलामांची विक्री होत नसे, त्यांना *कचरा* म्हणत. त्यांना कमी किंमतीत विकले जात असे. यामध्येही ज्यांची विक्री होत नसे, त्यांना जहाजावर अन्नपाण्याविना मरायला सोडून दिले जात असे. जवळच्या बेटांवरचे गुलाम यांतल्या काहींना वाचवत. पण बरेचसे तहान-भुकेने मरत.

गुलाम दक्षिण कॅरोलिनातील चार्ल्स टाऊनला पोहोचत तेव्हा कुणी गुलाम आजारी नाही याची खात्री करण्यासाठी त्यांना किडनाशक घरात ठेवत. हे घर बंदरावरच्या एखाद्या बेटावर असे. समजा, जहाजावरील कुणाला देवी रोग झाला तर त्याला या घरात महिनाभर ठेवत. चार्ल्स टाऊनजवळील किनाऱ्याला किंवा गोदीला आजही *इग्बो* म्हणून ओळखतात. कारण पश्चिम आफ्रिकेतील बऱ्याचशा इग्बो जमातीच्या लोकांनी तिथे पाण्यात उडी मारून आत्महत्या केली होती.

### चार्ल्स टाऊनच्या नावात बदल

दक्षिण अमेरिकेतील *चार्ल्स टाऊन*चे नाव इग्लंडचा राजा चार्ल्स दुसरा, यांच्या सन्मानार्थ ठेवण्यात आले होते. हे नाव 1783 साली क्रांतिकारकांच्या युद्धानंतर *चार्ल्सटन* असे बदलण्यात आले.


व्हर्जिनियातील *जेम्सटाऊन* वसाहतीत आलेले गुलाम.

प्रकरण तीन

# अमेरिकेत गुलामांचा व्यापार

1619 साली, सध्याच्या मॅसेच्युसेट्स येथे *मेफ्लॉवर* नावाचे जहाज पोहोचण्याच्या एक वर्ष आधी, वीस आफ्रिकी लोकांना एका डच जहाजातून व्हर्जिनियाच्या *जेम्सटाऊन* ब्रिटीश वसाहतीत आणण्यात आले. जहाजाच्या कप्तानाने काही आफ्रिकी गुलाम तिथे विकून टाकले. या गुलामांनी तिथे वेठबिगार म्हणून विनावेतन कित्येक वर्षे काम केले. यांतील काही गुलामांना बऱ्याच वर्षांनी मुक्त केले गेले. इतरांना आयुष्यभर गुलामगिरी करावी लागली.

शतकाच्या अखेरीस, अमेरिकेच्या दक्षिण भागातील वसाहतींमध्ये मोठमोठे मळे विकसित झाले. मग इथे येणाऱ्या किंवा जन्म घेणाऱ्या प्रत्येक आफ्रिकी माणसाला गुलाम मानले जाऊ लागले.
1700 च्या मध्यास, अमेरिकेच्या मेन राज्यापासून जॉर्जिया पर्यंतच्या किनारी प्रदेशांत गुलामांचे व्यापारी आणि दलाल यांची संख्या वाढली. गुलामांच्या व्यापारात ऱ्होड आयलंडमधील न्यूपोर्ट आणि ब्रिस्टॉल तसेच दक्षिण कॅरोलिनातील चार्ल्सटन यांसारखी छोटी शहरे सर्वात सक्रिय होती. गुलामांच्या व्यापारात रमणारे व्यापारी, जहाजाचे मालक, दलाल आणि कप्तान हेदेखील फिलाडेल्फिया, न्यूयॉर्क आणि बोस्टन अशा मोठ्या शहरांमध्ये काम करत असत.

बोस्टन आणि न्यू इंग्लंड प्रदेशातील इतर शहरे जहाजनिर्मितीची केंद्रे होती. वसाहतीत बांधण्यात येणारी जहाजे इंग्लंडमध्ये बांधण्यात येणाऱ्या जहाजांपेक्षा लहान होती आणि त्यांच्यावर कर्मचाऱ्यांची संख्याही कमी असे.

### व्हर्जिनियासाठी तंबाखू

जेम्सटाऊनमध्ये सुरुवातीच्या काळात स्थायीक झालेला *जॉन रॉल्फ* याने एका अमेरिकी इंडियन प्रमुखाची मुलगी *पोकाओन्तास*शी लग्न केले. जॉन रॉल्फने वेस्ट इंडिजमधून तंबाखूचे बीज आणून व्हर्जिनियामध्ये वाढवले. 1614 साली त्याने तंबाखूची सुकलेली पाने युरोपला पाठवली. तिथे ती खूप लोकप्रिय झाली. काहीच वर्षांनंतर, व्हर्जिनियातील शेतकऱ्यांनी 50,000 पौंड (22,680 किलो) तंबाखू युरोपला पाठवला. यात शेतकऱ्यांनी खूप पैसा कमावला. यामुळे वसाहतीच्या अर्थव्यवस्थेसाठी तंबाखूचे पीक खूप महत्त्वाचे ठरले.

अमेरिकेतून गुलाम घेऊन जाणारे पहिले जहाज *डिझायर* मॅसेच्युसेट्सच्या *मार्बलहेड* शहरात तयार झाले होते. 1638 साली इंग्रज सैनिक जवळच्या *सेलम* शहराच्या किनाऱ्यावरून डिझायर जहाजातून निघाले. त्यांच्यासोबत अमेरिकन इंडियन युद्धकैदी होते. युद्धकैद्यांना ब्रिटीश वेस्ट इंडिजमध्ये विकल्यावर, डिझायरचा कप्तान *विल्यम पिअर्स* न्यू इंग्लंडला परतला. त्याने आपल्यासोबत कापूस, तंबाखू, मीठ आणि काही काळे गुलाम आणले होते. हे गुलाम त्याने *कनेक्टिकट* येथे विकले.



व्यापारी गुलामांचा सार्वजनिक लिलाव करत आहे.

डिझायर जहाजाच्या पहिल्या दौऱ्यानंतर पंधरा वर्षांनी, काही व्यापाऱ्यांनी तीन मोठ्या जहाजांची बांधणी, कर्मचारी आणि आवश्यक सामान यांमध्ये पैसा गुंतवला. यांपैकी एक जहाज, *रेनबो*, सोने, चांदी, हस्तीदंत आणि गुलाम यांच्या शोधात आफ्रिकेला गेले. परतताना रेनबोने वेस्ट इंडिजला थांबून जहाजावरचे गुलाम विकले आणि मद्य, साखर, मीठ, तंबाखू खरेदी केले. हा माल ते न्यू इंग्लंड येथे विकणार होते.

## तांदळाची भेट

काही इतिहासकारांच्या मते, एका दंतकथेनुसार, 1600 च्या दशकात, आफ्रिकेच्या पश्चिमेला असलेल्या मादागास्कर बेटावरून एक जहाज वादळामध्ये चार्ल्स टाऊन बंदरात आश्रयाला आले. जहाजाच्या कप्तानाने कॅरोलिनाच्या गव्हर्नरला काही बियाणे दिली. येथूनच तेथील वसाहतीत भाताच्या पिकाची सुरुवात झाली. कॅरोलिनाचा किनारी प्रदेश भाताच्या पिकासाठी एक आदर्श भाग होता. इंग्लंड्च्या थंड हवामानात भात पीक उगवत नसे, त्यामुळे कॅरोलिनाच्या शेतकऱ्यांना भातपीक घेण्याचे ज्ञान नव्हते.

परंतु गुलामांना भात पीक कसे घ्यायचे, याचे ज्ञान होते. आफ्रिकेच्या भातशेती प्रदेशातून आलेल्या गुलामांनी जिथे भाताचे पीक घ्यायचे, तेथील खारे पाणी वाहून दलदलीत जाऊ नये म्हणून बंधारे बांधले. त्यांनी झाडेझुडपे दूर करून भातशेतीसाठी कालवे खोदले. गुलामांनी भाताचे भरघोस पीक घेतले. सुगीच्या काळात, गुलामांनी भात पिकाचे देठ कापून त्यांची मळणी केली आणि दाणे विलग केले.

### चिंध्या ते भरजरी

*जॉर्जिया* ही वसाहत 1733 साली गरीब इंग्रज लोकांसाठी वसवण्यात आली. सुरुवातीला, जॉर्जियाच्या अधिकाऱ्यांनी तिथे गुलामगिरी प्रथेस परवानगी दिली नव्हती. कारण त्यांना भय होते की गुलामगिरीमुळे गरीबांमध्ये आळस वाढेल. 1749 साली गुलामगिरी कायद्यात बदल करण्यात आला. कारण उत्तर कॅरोलिनातील गुलाम व्यापारी श्रीमंत होऊ लागले. गुलामांच्या व्यापारास परवानगी दिल्यावर, जॉर्जियामध्ये भात आणि कापूस शेतीचा विकास होऊ लागला आणि जॉर्जियातील काही शेतकरी श्रीमंत झाले.


दक्षिणेकडील शेतांच्या मालकांना भाताची शेती कशी करायची, हे गुलाम शिकवत आहेत.

मग त्यांनी भातपीक नावांवर लादून कॅरोलिनातील नद्यांद्वारे समुद्रापर्यंत नेले. तिथे हा भात इंग्लंडला पाठवण्यात आला आणि उच्च किंमतीला विकण्यात आला.

## नव्या देशाचा जन्म

ऑक्टोबर 1774 मध्ये पेनसिल्व्हानियातील *फिलाडेल्फिया* शहरात काँटिनेन्टल काँग्रेसची पहिली बैठक झाली. वसाहतींना ग्रेट ब्रिटनबाबत काय तक्रारी आहेत, यावर चर्चा करण्यासाठी प्रतिनिधी भेटले. परंतु त्यांनी असाही एक प्रस्ताव मंजूर केला की यापुढे वसाहतीत गुलामांना आणण्याची परवानगी मिळणार नाही. ब्रिटीश सरकारने हा प्रस्ताव अमान्य केला. कारण बऱ्याच इंग्रजांनी वसाहतीला गुलाम पुरवणाऱ्या *रॉयल आफ्रिका कंपनीत* मोठी आर्थिक गुंतवणूक केली होती.

वसाहतींनी स्वतःला ब्रिटनपासून स्वतंत्र करण्याचे ठरवले. *थॉमस जेफरसन* या व्हर्जिनियातील वकिलाने काँटिनेन्टल काँग्रेसच्या सभेत स्वातंत्र्याचा जाहिरनामा लिहिला. वसाहतीला स्वातंत्र्य का हवे आहे, याची कारणे त्यात लिहिली होती. पहिल्या मसुदात त्यांने गुलामगिरी प्रथेचा उल्लेख केला, परंतु कॅरोलिना वसाहतीने गुलामगिरीचा उल्लेख काढून टाकण्यासाठी दबाव आणला.

क्रांतिकारी लढ्यादरम्यान (1775-1783) गुलामांच्या व्यापारात खोट आली. गुलामांची काही जहाजे चाचेगिरी करू लागली. काही खाजगी जहाजांना शत्रुंच्या जहाजांवर हल्ला करण्याची परवानगी होती. एका खाजगी इंग्लिश जहाजाच्या कप्तानाने जहाजावरच्या पन्नास आफ्रिकींना बंदुका दिल्या आणि वेस्ट इंडिजच्या किनाऱ्यावरील फ्रेंच जहाजावर हल्ला करण्यास सांगितले. गुलामांनी बऱ्यापैकी संघर्ष केला, अशी नोंद त्या कप्तानाच्या रोजनिशीत आढळते. यानंतर कप्तानाने गुलाम विकण्यासाठी जहाज जमैकाला नेले.



*बेजामिन फ्रँकलीन, जॉन ॲडम्स आणि थॉमस जेफरसन* स्वातंत्र्याच्या जाहिरनाम्याचा पहिल्या मसुद्यावर चर्चा करत आहेत.

परंतु युद्धानंतर कापसाच्या भरघोस उत्पादनामुळे श्रीमंत लोकांना गुलामांची गरज वाटू लागली. 1790 पर्यंत दक्षिणेकडील राज्यातील शेतकऱ्यांच्या जमिनी या पिकामुळे नापीक झाल्या होत्या. तिथे पिके उगवणे कठीण होऊन बसले होते.

त्या काळात युरोपात तंबाखूचे अमाप पीक आले होते. कारण स्पेन, स्पॅनिश वेस्ट इंडिज आणि डच ईस्ट इंडिज (सध्याचे इंडोनेशिया) येथेही तंबाखूचे पीक घेतले जाते असे. तांदूळ आणि नीळ यांसारखी इतर पिके आता पहिल्याइतकी फायदेशीर राहिली नव्हती. पण इंग्लंडमध्ये विकसित झालेल्या नव्या यंत्रांमुळे कच्च्या कापसाची मागणी वाढली होती. न्यू इंग्लंड शाळेतील एक शिक्षक, *एली व्हिटनी*, यांनी कच्च्या कापसातील बियांपासून सरकी जलद गतीने वेगळे करण्याचे यंत्र तयार केले होते.



गुलाम कापसापासून सरकी दूर करणारे यंत्र चालवत आहेत. त्यांचे मालक यंत्रातून निघणाऱ्या कापसाची तपासणी करत आहेत.

### गुलामांचा व्यापार करणारे प्रतिष्ठित नागरीक

प्राचीन काळात बऱ्याच भागांत आढळणारी गुलामगिरी ही वसाहतिक अमेरिकेची जीवनशैली बनली होती. तेथील समाजातील अनेक आदरणीय लोक गुलामांच्या व्यापारात गुंतले होतं. उदाहरणार्थ, *पीटर फॅन्युइल*, याने बोस्टन फॅन्युइल सभागृह बांधले होते. तो एका गुलामाच्या जहाजाचा मालक होता. सैन्यासाठी पैसा उभारून क्रांतिकारी लढ्याला मदत करणारा फिलाडेल्फियाचा *रॉबर्ट मॉरीस* हासुद्धा गुलामांचा व्यापारी होता. युद्धात मोठी मर्दुमकी गाजवणारा आणि अमेरिकी नौदलाचा जनक, *जॉन पॉल जोन्स* हा गुलामांच्या जहाजावर कर्मचारी होता. *जॉर्ज वॉशिंग्टन, थॉमस जेफरसन, जेम्स मनरो, जेम्स मॅडिसन, अॅन्ड्र्यू जॅकसन* आणि असे अनेक अमेरिकी राष्ट्राध्यक्ष गुलामांचे मालक होते.

थोड्याच काळात, कापूस एक प्रमुख पीक बनले. कापसाची काही शेते तब्बल दोन-तीन हजार एकर परिसरावर पसरली होती. त्यामुळे, अमेरिकी शेतकऱ्यांना जास्त गुलाम मजुरांची गरज भासू लागली.

*थॉमस क्लार्कसन* हे इंग्लंडचे प्रमुख गुलामगिरी विरोधक होते.

प्रकरण चार

# गुलामांच्या व्यापारावर बंदी

1785 साली एका इंग्लिश कॉलेजचा विद्यार्थी, *थॉमस क्लार्कसन*, याने गुलामगिरी प्रथेतील अमानुषतेबद्दल वाचले आणि एक पारितोषिक विजेता निबंध लिहीला. त्याचे शीर्षक होते “एखाद्याला त्याच्या इच्छेविरुद्ध गुलाम बनवणे योग्य आहे का?”

क्लार्कसनने गुलामांचा व्यापार संपवण्यासाठी शक्य ते प्रयत्न करायचे ठरवले. तो लिव्हरपूल तसेच इतर गुलामांच्या इंग्लिश बंदरांवर गेला आणि तेथील कर्मचाऱ्यांशी बोलला. त्याने हॉटेलांना भेटी दिल्या. तिथे तरुणांना मद्य पिण्यास प्रोत्साहन देत आणि मग त्यांना गुलामांच्या जहाजावर नेऊन कर्मचारी बनण्यास प्रवृत्त करत. क्लार्कसनने गुलामांच्या जहाजांची तपासणीही केली आणि तेथील डॉक्टर, निवृत्त व्यापारी आणि कप्तान यांच्याशी संवाद साधला.

## गुलामगिरीविरोधात काव्य आणि गीते




अमेरिकी आणि ब्रिटीश कविंनी गुलामांच्या व्यापारविरोधात कविता लिहिल्या. संगीतकारांनी या कवितांना चाली लावल्या आणि गुलामगिरीविरोधातील सभांमध्ये त्या गायल्या जाऊ लागल्या. *जोसीआ वेजवुड* या प्रसिद्ध इंग्लिश कुंभाराने गुलामगिरीविरोधी चळवळीचे प्रतिक म्हणून एक छोटेसे शिल्प तयार केले. यात हात आणि पाय साखळ्यांनी जखडलेला एक काळा माणूस गुडघ्यावर बसून म्हणतोय: “काय मी एक माणूस आणि एक भाऊ नाही?” शिल्पाची ही आकृती तंबाखूच्या डब्यांवर सजवली होती. अटलांटिकच्या दोन्ही किनाऱ्यांवरील लोक अलंकार म्हणून ती अंगावर घालत असत.

त्याने बेड्या, साखळ्या, खिळे आणि बाटलीचे बूच उघडणारे धातुचे ओपनर अशा वस्तू गोळ्या केल्या. त्याने जकात खात्यात तासनतास घालवून जहाजांच्या व त्यांतील मालाच्या आवक-जावकसंबंधी नोंदींचा अभ्यास केला.
गुलामांशी केल्या जाणाऱ्या वर्तणुकीविषयी माहीती मिळवताना क्लार्कसनला गुलामांच्या जहाजांवर काम करणाऱ्या ब्रिटीश नाविकांच्याही नोंदी मिळाल्या. त्याला आढळले की आफ्रिकेला जाणाऱ्या या नाविकांपैकी निम्म्यापेक्षाही कमी नाविक पुन्हा मायदेशी जिवंत परतले आणि जे परतले ते उरलेले आयुष्य आजारी होते.
एके दिवशी क्लार्कसनने एका नाविकाशी गप्पा मारल्या. त्याने नुकतंच आपल्या जहाजाच्या कप्तानाला एका नाविकाची हत्या करताना पाहिले होते. बंदरावरून निघताना गुंडांच्या एका टोळीने त्यांच्यावर हल्ला केला.

क्लार्कसन यांतून बचावला. पण त्याने गुलामांच्या व्यापारासंबंधी तपासणी सुरुच ठेवली. उर्वरीत आयुष्य त्याने गुलामांच्या व्यापाराविरुद्ध लेख लिहिले आणि आवाज उठवला. 1789 साली, *विल्यम विल्बरफोर्स* याने ब्रिटनच्या कायदेमंडळात क्लार्कसनने गोळा केलेले पुरावे सादर केले. परंतु त्यांना समर्थन मिळाले नाही. याचे कारण, इंग्लिश कारखानदार, जहाज उत्पादक आणि गुलामांचे व्यापारी यांना आर्थिक नुकसान होईल, याचे भय होते.




इंग्लंमधील गुलामगिरीविरुद्ध लढा देणारे: *शार्प, मॅकॉले, विल्बरफोर्स, बक्स्टन* आणि *क्लार्कसन.*

परंतु 1807 मध्ये, कायदेमंडळाने गुलामांच्या व्यापारावर बंदी घालणारा कायदा पारित केला. 1808 साली अमेरिकेने गुलामांच्या आयातीवर बंदी आणली. तोवर फ्रान्सचा *लुइसियाना* हा भाग खरेदी केल्यामुळे अमेरिकेचा भूभाग दुप्पट झाला होता. बऱ्याच शेतकऱ्यांना कापूस आणि साखर यांची पिके घेण्यासाठी मजुरांची गरज होती. अशाप्रकारे, काही आफ्रिकी, युरोपीय आणि अमेरिकी लोकांनी गुलामांचा व्यापार सुरू ठेवण्यासाठी दंड, तुरुंगवास आणि मृत्यूचीसुद्धा जोखीम पत्करली.

## आफ्रिकी समुद्रात ब्रिटीश जहाजांची गस्त

ब्रिटीश नौका आफ्रिकेच्या पश्चिम किनारी भागात गस्त घालू लागल्या. एखाद्या जहाजात गुलाम आहेत, असा संशय येताच ते जहाज अडवू लागल्या. या जहाजांना पकडणे तसे सोपे नव्हते. गुलामांचे व्यापारी जहाजनिर्मात्यांनी बनवलेली वेगवान जहाजे वापरू लागले होते. काहीवेळा गस्त नौका जवळ येताच, कप्तान गुलामांना समुद्रात फेकून देत. एका इंग्लिश कप्तानाने *ब्रिलियंट* नावाच्या जहाजाद्वारे गुलामांचा बेकायदेशीर व्यापार केला. जेव्हा चार गस्त नौका जवळ आल्या तेव्हा कप्तानाने त्याच्या कर्मचाऱ्यांना गुलामांना नांगराच्या साखळ्यांना जखडण्याचा आदेश दिला आणि मग नांगर समुद्रात टाकून दिला. यात सर्व गुलामांचा मृत्यू झाला.



ब्रिटीश जहाजाने गुलामांनी भरलेले एक जहाज पकडले.

अशा कठीण परिस्थितीतही ब्रिटीश जहाजांनी 1,635 जहाजे पकडून 1,60,000 गुलामांना मुक्त केले. काही गुलामांना इंग्रजांनी 1787 साली मुक्त गुलामांसाठी वसवलेल्या *फ्री टाऊन* शहरात नेले. हे शहर (हे शहर सध्या आफ्रिकेतील सिएरा लिओनची राजधानी आहे). इतर गुलामांना अमेरिकेने 1816 साली स्थापन केलेल्या आफ्रिकेतील लायबेरीया देशात नेले. अमेरिकेतील काही काळे मुक्त गुलामही लायबेरीयात स्थायिक झाले.

ब्रिटीश गस्त नौका आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर फिरत. त्यामुळे गुलामांचे व्यापारी आपली जहाजे दक्षिण टोकाच्या केप होपला वळसा घालून नेऊ लागले.



गुलामांना कैद करण्यासाठी लोखंडाच्या अवजड बेड्या वापरत.

एव्हाना, मध्यपूर्वेतील अनेक अरबांनी आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्यावर व्यापारी चौक्या वसवल्या होत्या. स्वाहिली व्यापाऱ्यांची मदत घेऊन त्यांनी आफ्रिकेच्या अंतर्गत भागात गुलामांचा व्यापार सुरू केला. ते हजारो गुलामांना एकत्र बांधून शेकडो मैल चालण्यास प्रवृत्त करत. तिथून त्यांना जहाजाने 24 मैलांवर झांजीबार बेटांवर नेत (झांजीबार सध्या टांझानियात आहे).

### एक प्रसिद्ध गुलामांचा व्यापारी

आफ्रिकेच्या अंतर्गत भागात *टिपू टीब* नावाचा एक गुलामांचा व्यापारी राहात होता. त्याच्या नावाचा अर्थ होता “बंदुकांचा आवाज,” कारण तो जेव्हा गावांवर हल्ला करत असे, तेव्हा लोकांना बंदुकांचा आवाज येत असे. टिपू टीब आणि काही इतर व्यापारी काळ्या गुलामांना विविध प्रकारच्या सेवा करायला लावत. व्यापारी गुलामांसोबतच हस्तीदंताचाही व्यापार करत आणि काही गुलामांना अवजड हस्तीदंत जंगलातून समुद्रकिनाऱ्यापर्यंत वाहून आणावे लागत असे. काही गुलामांना त्यांच्या स्वत:च्याच प्रजातीतील लोकांवर हल्ला करून नवीन गुलाम मिळवावे लागत असे. मुलींना आणि स्त्रियांना घरकाम करावे लागे किंवा अरब पुरुषांची पत्नी बनावे लागे.



## पूर्व किनाऱ्यावरील गुलामांची राजधानी

1832 साली झांजीबारचे सर्वात मोठे शहर, झांजीबार हे एका विशाल अरब राज्याची राजधानी तसेच पूर्व किनाऱ्यावरील गुलामांची प्रमुख बाजारपेठ बनले. प्रत्येक वर्षी, वीस ते चाळीस हजार गुलाम झांजीबारला आणले जात असे. गुलामांनी भरलेले जहाज आले की बाजारातील चौकात वरून खालपर्यंत खरेदीदारांची गर्दी होत असे.

आजही आफ्रिकेतील बाजारपेठा समृद्ध आहेत.



यांपैकी एक-तृतीयांश गुलाम झांजीबारच्या लवंग, कोको आणि नारळाची शेती करणाऱ्या शेतकऱ्यांना विकले जात असत. नारळाचे तेल साबण बनवण्यासाठी वापरत असत. बाजारात विक्री करण्याआधी पुरुष गुलामांचे शरीर तेल चोपडून चमकवले जात असे. तरूण गुलाम मुलामुलींना सर्वात जास्त किंमत मिळत असे आणि वृद्ध गुलामांना सर्वात कमी. काही वेळा 150 गुलामांना एका पिंजऱ्यात बंद करून पिंजऱ्याची किंमत लावली जात असे. ज्या गुलामांची विक्री होत नसे त्यांना झांजीबारच्या ओलसर, काळोख्या गुहांमध्ये ठेवत. मग त्यांना जहाजाने अरेबिया, इराक, पर्शिया (सध्याचे इराण) किंवा तुर्की येथे विकत. त्यातून अरब व्यापाऱ्यांना मूळ किमतीच्या दहापट पैसा मिळत असे.



अरब व्यापारी दरवर्षी हजारो गुलामांना झांजीबार बेटावर आणत.

अमेरिकी व्यापाऱ्यांनाही झांजीबारच्या बाजारपेठेचा शोध लागला. अमेरिकी जहाजे बहुधा मॅसेच्युसेट्स राज्यातील सेलम बंदरात थांबत. जहाजाचे कर्मचारी झांजीबारच्या गुलाम बाजारात सुती कपड्यांच्या बदल्यात गुलाम आणि हस्तीदंत खरेदी करत. बंदराची राखण करणाऱ्या ब्रिटीश गस्त नौका त्यांना रोखू शकत नसत. अमेरिकी कप्तान आपल्या जहाजांवर विदेशी झेंडे फडकावत आणि आपल्या जहाजांची खोट्या नावाने व क्रमांकाने नोंद करत असत.

डच ईस्ट इंडिया कंपनीची जहाजे एका डच बंदरात जात आहेत.

प्रकरण पाच

# दक्षिण आफ्रिकेतील युरोपीय

आफ्रिकेच्या दक्षिण टोकावर वसलेले सर्वात पहिले गोरे लोक डच ईस्ट इंडिया कंपनीसाठी काम करत. 1632 साली ते तिथे एक तळ स्थापन करण्यासाठी आले. या तळामुळे डच जहाजे आपल्या कर्मचाऱ्यांना ताजी भाजी आणि मांस देऊ शकले. गोऱ्या लोकांचे आगमन झाल्यावर तेथील बहुतेक काळे लोक तो भाग सोडून निघून गेले. त्यामुळे कंपनीच्या शेतांवर काम करण्यासाठी आफ्रिकेच्या इतर भागांतून गुलाम आणावे लागले. नंतर, कंपनीचे काही कर्मचारी स्वतःच शेती करू लागले. ते *बोअर* म्हणून ओळखले जात. डच भाषेत बोअर म्हणजे शेतकरी. जर्मन आणि फ्रेंच शेतकरीही त्यांच्यात सामील झाले.



1804 च्या या चित्रात दक्षिण आफ्रिकेचा एक गुलाम आपल्या *बोअर* मालकासोबत शिकार करून परतत आहे.

हे सर्व शेतकरी स्वत:ला *आफ्रिकनर* म्हणवू लागले आणि त्यांनी *आफ्रिकान्स* ही नवीन भाषा विकसित केली. 1700 पर्यंत गोऱ्या लोकांनी त्या भागातील बहुतांशी सुपीक जमिनी ताब्यात घेतल्या. जे काळे लोक अद्याप तिथे राहात होते, ते या शेतकऱ्यांचे नोकर किंवा गुलाम बनले. डच आणि ब्रिटीश यांच्यात दक्षिण आफ्रिकेत बरीच वर्षे लढाया झाल्या. 1814 च्या सुमारास ब्रिटिशांनी तेथे राज्य केले. 1834 साली त्यांनी गुलामगिरी प्रथा बंद केली. गुलामांना मुक्त केल्यामुळे हजारो आफ्रिकनर लोक शेती सोडून आपले सामान बैलगाड्यांवर लादून अंतर्गत भागात निघून गेले. यादरम्यान, *बंटू* बोलीभाषा बोलणाऱ्या लोकांनी त्यांना अडवून त्यांच्याशी लढाया केल्या.

## डच ईस्ट इंडिया कंपनी

त्याकाळी अनेक देशांमध्ये व्यापार करण्यासाठी तीव्र स्पर्धा होती. डच सरकारने व्यापारात जम बसवण्यासाठी आणि तो वाढवण्यासाठी डच ईस्ट इंडिया कंपनीला काही विशेष अधिकार दिले होते. सरकारच्या परवानगीने, डच ईस्ट इंडिया कंपनी व्यापारासोबतच, स्थानिक अधिकाऱ्यांशी करार करू शकत होती, किल्ले बांधू शकत होती आणि सैन्यदेखील बाळगू शकत होती. कंपनीचे मुख्यालय *डच ईस्ट इंडिजमध्ये* (सध्याचे *इंडोनेशिया*) होते. त्यांची जहाजे युरोपवरून ईस्ट इंडिजला ये-जा करत असत. ही जहाजे दक्षिण आफ्रिकेच्या टोकाला (सध्याचे केप ऑफ गुड होप) थांबून, रसद भरून पुढे जात असत.

आफ्रिकेतील स्कॉटीश धर्मप्रचारक *डॉ. डेव्हिड लिव्हिंगस्टोन* यांनी आफ्रिकनर गावांमध्ये आल्यावर काय घडले, याचे वर्णन केले आहे. “त्यांच्या प्रथेनुसार त्यांनी बागकाम करण्यासाठी वीस-तीस स्त्रियांची मागणी केली. मी या स्त्रियांना बघितले....त्या आपल्या डोक्यावर अन्न, पाठीवर मुलं आणि खांद्यावर फावडे घेऊन जात होत्या.”
डेव्हिड लिव्हिंगस्टोन यांनी आफ्रिकी लोकांना ख्रिस्ती बनण्यासाठी प्रोत्साहन दिले. त्यांनी तिथे गुलामांच्या व्यापाराऐवजी कायदेशीर व्यवसाय विकसित करण्याची योजना बनवली. एकदा संध्याकाळी लिव्हिंगस्टोन आणि इतर धर्मप्रचारक आपल्या तंबुच्या बाहेर विश्रांती घेत असताना काही गुलाम तिथे आले. त्यांना अवजड लाकडी जोताला एकत्र बांधले होते आणि काही आफ्रिकी लोक त्यांची राखण करत होते. गोरे धर्मप्रचारक जाणत होते की आपण त्यांना रोखले तर त्या भागातील पोर्तुगीज व्यापारी आपल्यावर हल्ला करतील किंवा आपली रसद तोडतील. “का रोखायचे नाही त्यांना?” लिव्हिंगस्टोनने ठामपणे प्रश्न उपस्थित केला. मग मात्र गोरे लोक ठामपणे गुलामांच्या बाजूने उभे राहिले. गुलामांचे व्यापारी जंगलात पळून गेले. धर्मप्रचारकांनी 84 गुलाम पुरुष, स्त्रिया आणि मुलांना मुक्त केले.



डेव्हिड लिव्हिंगस्टोन हे स्कॉटीश धर्मप्रचारक होते. त्यांनी गूलामांचा व्यापार रोखण्याचा प्रयत्न केला.

डेव्हिड लिव्हिंगस्टोन यांचा मृत्यू आफ्रिकेत झाला. त्यांना गुलामांचा व्यापार रोखणे शक्य झाले नाही. त्यांचे लेख युरोपात पोहोचताच अनेक धर्मप्रचारक आणि शोधप्रवासी आफ्रिकेत आले. त्यांनी लिहिलेल्या पुस्तकांमुळे युरोपीय लोकांचा समज झाला की आफ्रिकी लोकांमध्ये गुलाम म्हणून जगण्याची भावना स्वभावत:च आहे. शिवाय, आफ्रिकी लोक स्वत:ची काळजी घेऊ शकत नाहीत, त्यासाठी त्यांना गोऱ्या लोकांची गरज असते, असाही अर्थ त्यातून निघत होता.

## गुलामांच्या व्यापारामुळे आफ्रिकेवर झालेले परिणाम

गुलामांच्या व्यापाराने कुटुंबे आणि समाज यांच्यात ताटातूट झाली. लोकसंख्याशास्त्रज्ञ, जे लोकसंख्येचा आकार आणि वितरण यांचा अभ्यास करतात, त्यांच्या मते गुलामांचा व्यापार नसता तर आज आफ्रिकेत आणखी किती लोक राहात असते, हे सांगता आले असते. ते हेदेखील निश्चित सांगू शकत नाहीत की तेथील भूभागामध्ये काय बदल झाला असता. शेतीयोग्य जमीन जास्त प्रमाणात असती? काही भूभाग जास्त औद्योगिक असते? गुलामांचा व्यापार नसता किंवा युरोपीय लोकांनी तो वाढवला नसता तर आज आफ्रिका कसा असता? कुणीही या प्रश्नांची उत्तरे देऊ शकलेले नाहीत. पण एक गोष्ट निश्चित आहे: आफ्रिकेने आपले लाखो पुरूष, स्त्रिया आणि मुले गुलामगिरीमध्ये गमावली.

## कालानुक्रम

1433 – युरोपीय जहाजांच्या कप्तानांनी पश्चिम आफ्रिकेच्या किनाऱ्याचा शोधप्रवास केला.

1442 – एका पोर्तुगीज जहाजाचा कप्तान बारा गुलाम घेऊन पोर्तुगालला परतला.

1492 – कोलंबसने नवे जग शोधले.

1501 – स्पेनने आफ्रिकन लोकांचा पहिला गट त्यांच्या कॅरेबियन वसाहतीत आणला.

1619 – उत्तर अमेरिकेतील व्हर्जिनिया राज्याच्या *जेम्सटाऊन* या पहिल्या इंग्लिश वसाहतीत वीस आफ्रिकी लोकांना आणण्यात आले.

1772 – ब्रिटनने देशातील सर्व गुलामांना मुक्त केले.

1807 – ब्रिटनमध्ये गुलामांचा व्यापार बंद झाला.

1808 – अमेरिकेत गुलामांचा व्यापार बंद झाला.

1861- 1865 अमेरिकी नागरी युद्धाने अटलांटिक गुलामांचा व्यापार बंद केला आणि अमेरिकेतील गुलामांचा व्यापार पूर्णत: बंद झाला.

1888 – ब्राझीलने त्यांच्या गुलामांना मुक्त केले.